शासकीय अधिकाऱ्यांना जुनी मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन निर्णय, क्रमांक:-अग्रिम-१०९३/प्र.क्र.१६३/९४/विनियम,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक:- 25 MAR 1994

वाचा:- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:-अग्रिम १०९३/प्र.क्र.१४/९३/विनियम, दिनांक १ एप्रिल, १९९३.

निर्णय

मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ मधील नियम १३६ आणि तदअनुषंगिक वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांतील तरतुदींच्या अधीन राहून शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक:-अग्रिम-१०९३/प्र.क्र.१४/९३/विनियम, दिनांक १ एप्रिल १९९३ नुसार शासकीय अधिकाऱ्यांना नवीन मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूर करण्याबाबतचे आदेश काढण्यात आले आहेत. यासंबंधी आधीच अस्तित्वात असलेल्या नियमांच्या/आदेशांतील अटींच्या अधीन, तसेच पुढील अटींच्या अधीन राहून शासकीय अधिकाऱ्यांना जुनी मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिम मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

[१] अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या अधिकाऱ्याची सेवानिवृत्तीपूर्वी व्याजासह संपूर्ण अग्रिम रक्कम परतफेड करण्याची क्षमता असल्याची, अग्रिम मंजूर करण्यास सक्षम असलेल्या अधिकाऱ्याने अग्रिम मंजुरीपूर्वी खात्री करावी.

[२] अधिकाऱ्याचे सुधारीत वेतनश्रेणीनुसार मासिक मूळ वेतन किमान रुपये ३,५००/- [रुपये तीन हजार पांचशे मात्र] इतके असावे.

[३] जुनी मोटार कार खरेदी करण्यासाठी अग्रिमाची रक्कम जास्तीत जास्त रु.५०,०००/- [रुपये पन्नास हजार फक्त] किंवा अधिकाऱ्याचे १० महिन्याचे मूळ वेतन किंवा जुन्या मोटार कारची प्रत्यक्ष किंमत यापैकी जी कमी असेल तेवढी असावी.

[४] सदर अग्रिमावर शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या दराने व्याज आकारण्यात यावे.

[५] अग्रिमाची वसुली करतांना प्रथमतः मुद्दलाची ५० समान मासिक हप्त्यात वसुली करावी व त्यानंतर व्याजाची वसुली ३० हप्त्यात करावी मात्र एखादा अधिकारी नियत वयोमानानुसार उपरोक्त मासिक हप्त्याचे ८० महिने पूर्ण होण्यापूर्वी सेवानिवृत्त होणार असेल तर त्याच्या सेवानिवृत्तीपूर्वी संपूर्ण अग्रिमाची व्याजासह वसुली होईल अशाप्रकारे वसुलीचे हप्ते निश्चित करण्यात यावेत.

H 1364 - 13000 - 3-94

[कृ.मा.प.]

[६] वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यात आलेल्या अधिका-यास, सो अग्रिम मंजूरीच्या दिनांकापासून ४ वर्षापर्यन्त मोटार कारसाठी अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही. त्याचप्रमाणे मोटार कार खरेदीसाठी अग्रिम घेतलेल्या अधिका-यास अशा अग्रिमाच्या मंजूरीच्या दिनांकापासून ४ वर्षापर्यन्त वैयक्तिक संगणक खरेदी करण्यासाठी अग्रिम अनुज्ञेय असणार नाही.

[७] मोटार कार अग्रिम मंजूरीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आंत मान्यताप्राप्त विक्रेत्याकडून जुनी मोटार कार खरेदी करण्यात यावी व तसे कागदपत्र शासनास सादर करावेत.

[८] मोटार कार ज्या महिन्यात खरेदी केली त्याच्या पुढील महिन्यापासून अग्रिमाच्या वसूलीस सुरुवात करण्यात यावी.

[९] अग्रिम मंजूरीच्या दिनांकापासून १ महिन्याच्या विहित मुदतीत मोटार कार खरेदी न केल्यास ही संपूर्ण रक्कम १ महिन्यानंतर दंडनीय व्याजासह एक रकमी वसूल करण्यात यावी.

[१०] खरेदी करावयाची जुनी मोटार कार ५ वर्षापेक्षा जास्त जुनी नसावी.

[११] जुनी मोटार कार अग्रिमाची व्याजासह परतफेड होईपर्यन्त अशी मोटार कार शासनाकडे गहाण राहिल. त्यासाठी संबंधित अधिकां-यांस विहित नमुन्यात व कार्यपध्दतीप्रमाणे गहाणखत भरुन देणे आवश्यक राहिल. तसेच असे गहाणखत भरुन देण्यापूर्वी सदर मोटार कार यांत्रिकीदृष्टया सुदृढ आहे याची जबाबदारी अग्रिम घेणा-या संबंधित अधिका-याची राहील. त्याप्रमाणे जर एखाद्या प्रसंगी यांत्रिकीदृष्टया सुदृढ नसलेली जुनी मोटार कार शासनाकडे गहाण ठेवली गेल्यास व अशा मोटार कारच्या अग्रिमाच्या वसूलीसाठी लिलावाने विक्री करावयाचा प्रसंग उद्‌भवल्यास अशा लिलावापासून येणा-या रकमेपेक्षा शिल्लक राहणारी वसूलीपात्र रक्कम दंडनिय व्याजासह संबंधित अधिका-याच्या सेवाउपदान, गटविमा योजना, रजेचे रोखीकरण इ.. अनुज्ञेय रकमांमधून वसूल करण्यात यावी.

[१२] गहाणखतामध्ये जुन्या मोटार कारचा मेक [ Make ] मॉडेल [ Model ] आणि चेसिस क्रमांक [ Chasis No.    ] स्पष्टपणे नमूद करण्यात यावेत.

[१३] शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-विअप्र १०८९/[५६]/ विनियम, दिनांक ६ नोव्हेंबर १९९० अनुसार प्रदान केलेल्या वित्तीय अधिकाराप्रमाणे सक्षम अधिकारी अर्जदाराने आवश्यक बाबींची पूर्तता केल्यानंतर मोटार कार अग्रिम मंजूर करु शकतील.

[१४] अग्रिम मंजूर करताना मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ मधील नियम १२४ [बी] प्रमाणे लागू ठरणा-या दंडनीय व्याजाचा उल्लेख मंजूरीच्या आदेशात करण्यात यावा.

H 1364

[१५] शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-अग्रिम-१०९३/प्र.क्र.१४/९३/-विनियम, दिनांक १ एप्रिल १९९३ नुसार नवीन मोटार कार साठी अग्रिम किंवा हयां आदेशानुसार अनुज्ञेय ठरणारे जून्या मोटार कार साठीचे अग्रिम यापैकी कोणते तरी एकच अग्रिम अनुज्ञेय राहील.

[१६] अग्रिमाची व्याजासह पूर्ण परतफेड होईपर्यन्त उपरोक्त जून्या मोटार कारचा शासकीय विमा निधीकडे विहीत पध्दतीने विमा उतरविण्यात यावा व तो सतत चालू राहील याची संबंधितानी वेळोवेळी दक्षता घ्यावी.

२. नवीन मोटार कार खरेदीसाठी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदी मधूनच जून्या मोटार कार खरेदीसाठीचा अग्रिम मंजूर करावा.

३. मुंबई वित्तीय नियमावली, १९५९ मधील संबंधित नियमात आवश्यक ती दुरुस्ती यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ. कृ. गोलतकर
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल[लेखा व अनुज्ञेयता]-१, महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल[लेखा व अनुज्ञेयता]-२, महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल[लेखा परीक्षा]-१, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल[लेखा परीक्षा]-२, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मंत्रालयीन सर्व विभाग
सर्व विभागीय आयुक्त
मंत्रालयाच्या सर्व विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

H.1364

४/-

प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
संचालक, शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई / नागपूर / औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभागातील सर्व कार्यासने/अधिकारी,
निवड फाईल, वित्त विभाग, विनियम.

* पत्राव्दारे.

———————— X ————————